ॐ श्रीगणेशाय नमः । देवेश भ्रूशुण्डीस विचारिती । देवमुनींनी केली स्तुति । महानदीची ब्रह्मदेवासाठीं ती । तें स्तुतिस्तोत्र सांगा आम्हां ।।१।। सुखप्रद तें स्तोत्र होईल । ऐसी प्रार्थना ऐकून विमल । भ्रूशुण्डी तयांसी प्रेमळ । वृत्तान्त सांगे सविस्तर तो ।।२।। नाना तीर्थजळांत स्नान करित । परी ब्रह्मा शुद्ध न होत । तीर्थजळें झालीं असमर्थ । ब्रह्मदेवाचें पाप हरावया ।।३।। तेव्हां सारे देव विचार करित । तुरीय तीर्थासी

मु. पु. खंड. ६ अ. २४-२५

कर जोडित । भक्तिभावें त्याचें स्तोत्र गात । देवांनो तें आतां ऐका ।।४।। सर्वादिभूत जें त्रिगुणीं स्थित । तीर्थांत सर्वविकाररहित । पापविनाशीं दक्ष अत्यंत । ऐशा तुरीय तीर्था नमितों ।।५।। गंगादि नद्यांचा उगम त्यापासून । ते सर्वान्तरंगी स्थित पावन । आत्मरूप नादात्मक चालक होऊन। त्या तुजला नमितों आम्हीं ।।६।। पुराणें ज्याचें गीत गातीं । विधीच्या पापाची जें करी क्षती । कमंडलूंत ज्याची वसती । अप्रमेय परम जें असे ।।७।। अपार तीर्थांत आत्मभाव धरित । त्यायोगें देहधर त्यास नमित । नाथ विधातृपद भूषवित । तो जरी पापी जाहला ।।८।। तरी त्यासी वाचवित । विश्वाचा नाश टाळित । दयाळू ऐसें जें तीर्थ । त्या तुरीयास नमितों आम्हीं ।।९।। गंगास्वरूपा तुज नमन । ब्रह्मात्मज अरूपधरासी वंदन । वेणीस्वरूपा पुष्करा अभिवादन । तापीप्रभासा सर्वतीर्थरूपा ।।१०।। प्रयाग नर्मदा कालिंदीरूपा । कृष्णा ककुद्मती देवनदीस्वरूपा । पयोष्णी गोदावरीरूपा । क्षिप्रा सिन्धुस्था तुज नमन ।।११।। महीस्वरूपा कावेरीस्थिता । सरयूस्वरूपा कमंडलूवान उदात्ता। साडेतीन कोटि तीर्थयुक्ता । तीर्थोत्तमा तुज नमन ।।१२।। अनंततीर्थप्रवरा मयूरस्थिता । सागरस्था सरोवरवापीस्था । कूपस्था तीर्थोत्तमा तुज आतां । आदरभावें नमितों आम्हीं ।।१३।। जें जें जळ सूर्यापासून । घनरूपें पृथ्वीवरी करी अवतरण । तें तुझेंच रूप शोभन । ऐशा तुला नमितों आम्हीं ।।१४।। तूं पसरविलें हें विश्व सर्व । चराचरांत जलयुक्त थोर । कृपाकटाक्षअमृतधारा अपूर्व । वाहवून रक्षण आमुचें करी ।।१५।। दाखवी स्वरूप आम्हांसी । ऐसें स्तवनकर्त्या त्या देवमुनींसी । दाखवी तेजोमय जलरूपासी । सुरर्षि नमिती आदरें ।।१६।। तैं महातीर्थ त्यास म्हणत । हर्षयुक्त चित्तें वचन उदात्त । भ्रूशुण्डी सांगे देवांप्रत । देवेश मुनींनो वर मागा ।।१७।। जो मागाल वर ।

तो तो मी देईन समग्र । तुम्ही रचिलेलें हें पुण्यस्तोत्र । प्रीतिवर्धक मज सर्वदा ।।१८।। यांत संदेह नसत । भुक्तिमुक्तिप्रद हें नितांत । पाठका वाचका अविरत । स्नानाचें फळ लाभेल ।।१९।। सर्व पापांचा नाश करील । वाचितां ऐकतां स्तोत्र हें विमल । सर्वतीर्थाचें हें वचन अमल। सुरर्षि हर्षित फार झाले ।।२०।। देवेश जोडून करसंपुट वंदिती । त्या तीर्थासी तेव्हां सर्व प्रार्थिती । महातीर्था प्रसन्न जरी सांप्रती । पितामहासी शुद्ध करी ।।२१।। त्याच्या कमंडलूंत स्थिर वसती । करावी तेणें वाढावी महती । सर्वतीर्था तुझी ख्याती । ब्रह्मकमंडलूनामें व्हावी ।।२२।। तुझ्या प्रसादें हाचि वर लाभावा । तथाऽस्तु म्हणे तें तीर्थ देवां। देवविप्रांच्या इच्छेला मान द्यावा । ऐसी प्रीती तयांवरी ।।२३।। देवेश भ्रूशुण्डीस प्रार्थित । ऐकिलें सर्व संशयहर पुनीत । तथापि मन पूर्ण तृप्त। न झालें कथामृतपानानें ।।२४।। महातीर्थाचें माहात्म्य अद्भुत । वर्णिलें विप्रा तूं आम्हांप्रत । पूर्वी कोणास सिद्धि प्राप्त । त्याचें चरित्र सांगावें ।।२५।। भ्रूशुंडी म्हणे तयांप्रत । पूर्वी होता द्विज भारद्वाज कुळांत । तो मुर्ख संध्यादि विद्यावर्जित । चिंतामग्न याचे मायबाप ।।२६।। त्यास घेऊन ते जात । नदीमूळ जेथ विराजत । ब्रह्मकमंडलू तीर्थ अद्भुत । परमभावभक्तीनें ।।२७।। नदीजलांत स्नान करून । करिती गणेशाचें पूजन । कमंडलुतीर्थतीरीं विधि आचरून । भक्तियुक्त त्या वेळीं ।।२८।। तेव्हां आश्चर्य एक घडत । त्यांचा पुत्र पंडित होत । सुबुद्धियुक्त तो म्हणत । वेदादी अस्खलित समस्त ।।२९।। आपुल्या सुतासी घेऊन जाती । होऊन हर्षनिर्भर चित्तीं । गावीं आनंदें राहती । अन्तीं मुक्ति लाभली तयां ।।३०।। ऐसे नाना जन लाभत । स्नान करितां सिद्धि इष्ट । कळत अथवा नकळत । कमंडलुतीर्थदर्शनानेंही ।।३१।। दुसरा एक वृत्तान्त। कथितों तुम्हांसी सांप्रत । रविवंशज क्षत्रिय सुरथ असत।

मालव देशीचा नरपति ।।३२।। स्वराज्य धर्मनीती चालवित । सचिवांचा सल्ला मानित । परवीरांचा दर्प हरित । विदर्भाधिपति एकदां झाला ।।३३।। दिग्‌विजयार्थ तो संचार करित । माळव्यावरी चालून जात । तेव्हां सुरथ राजा युद्ध करित । घनघोर तयासवें ।।३४।। परी दुर्दैवें सुरथ पराजित । होऊन कान्तारीं पळून जात । अन्य राजांचें साहाय्य घेत । पुनरपि लढे निश्चयानें ।।३५।। घोर संग्राम तैं होत । त्यांतही पुन्हा पराजित । तेव्हां तो मयूरेश्वरक्षेत्रांत । आश्रयार्थ पातला ।।३६।। ब्राह्मणांसी विचारित । मध्यमेश्वर तीर्थीं स्नान करित । तदनंतर शंकरासी पूजित । प्रणाम करी तयासी ।।३७।। तदनंतर सेना जमवून । गेला विदर्भ नृपावरी चालून । त्या युद्धांत विजय मिळून । मिळवलें स्वराज्य परत त्यानें ।।३८।। अन्तीं त्यास मुक्ति लाभत । स्नानाचें हें माहात्म्य अद्भुत । ऐशापरी जाणतां वा अजाणत । सिद्धि लाभली तेथ जनांसी ।।३९।। दुसरें एक पुण्यप्रद चरित । प्राज्ञांनो ऐका श्रद्धायुक्त । गौतमवंशीय द्विज पंडित । स्वधर्मनिष्ठ ज्ञानघन ।।४०।। परी त्यासी यश न लाभत । दीक्षादिकांत प्रयत्नें सतत । ब्राह्मण त्याचें कर्म पाहत । दोषदृष्टीनें सर्वकाळ ।।४१।। त्यायोगें अतिखेदयुक्त । तो ब्राह्मण सर्वतीर्थाची यात्रा करित । विचार करून स्नान करित । गौतमवंशकुलोत्पन्न तो ।।४२।। हृषिकेशास पूजून । त्याला वंदन करून । तो स्वगृहीं गेला परतून । पुनरपि वैदिक कर्मे करी ।।४३।। आतां अन्य द्विजांस तें मान्य होत । ते त्यासी न निंदित । तो जें जें कर्म करित । तें तें होई यशस्वी ।।४४।। अन्ती तो मुक्त होत । तीर्थसेवनपुण्यें जगांत । ऐसें जाणून न जाणताही जे जात । तीर्थास ते मुक्त होती ।।४५।। त्यांची गणना अशक्य असत । अन्यही ऐका एक चरित । दंडकारण्यदेशांत । होता एक चांडाळ पापी ।।४६।। वनांत जाऊन

द्विजहनन । करी तो परस्त्रीचें अपहरण । रानात एकटी पकडून । बलात्कारें भोगी तिजला ।।४७।। ऐसा तो विषयलंपट करित । नानाविध पापें कामासक्त । एकदा एक धनिक वाणी दिसत । पाठलाग त्याचा तो करी ।।४८।। हातांत शस्त्रें घेऊन । मागें जाई करण्या हनन। मार्गात ब्रह्मकमंडलूद्भव सरिता पाहून । चांडाळ गेला तिच्या जवळीं ।।४९।। परी जलस्पर्शादिक न करित । अत्यंत दुर्मति तो असत । तदनंतर योजनमात्र चालत । ठार मारी त्या वाण्यासी ।।५०।। त्याचें द्रव्य लुटून । स्वगृहासी गेला परतून । पुढें तो नीचयोनिज मरत । यमदूत त्यासी पकडिती ।।५१।। ताडिती अत्यंत ते निष्ठुर । यमपुरीस नेती सत्वर । यमधर्म त्या दूतांस क्रोधपर । वचन म्हणे धर्मयुक्त ।।५२।। जरी हा महापापी असत । तरीही सोडा यास त्वरित । सर्वतीर्थाचें दर्शन पुनीत । यास घडलें होतें पूर्वी ।।५३।। वाण्यास ठार मारण्या इच्छित। तैं मार्गीं हें तीर्थ पाहत । त्यायोगें पाप नष्ट होत । यास मानवी देह द्यावा ।।५४।। हा शुभाशुभ कर्मै करील । तेव्हा पुढें उद्धरेल । विचक्षण दूतांनो प्रभाव विमल । जाणा तीर्थदर्शनाचा ।।५५।। त्या यमवचनानुसार । बंगाल देशांत जन्मत नंतर । ऐशियापरी तो शूद्र । तीर्थदर्शनें दुरितमुक्त ।।५६।। या तीर्थाच्या जलबिंदूचा । स्पर्श होता पुण्यवृष्टीचा । योग येऊन मानवाचा । उद्धार जगीं होतसे ।।५७।। याविषयीं एक चरित । सर्वज्ञ देवहो ऐका एकचित्त । कोण्या एका वनांत । व्याध होता महापापी ।।५८।। तो ब्रह्महत्यादि पापें करित । एका धनिकास दैवें पाहत । खड्ग उगारून मारण्या धावत । तेव्हां तो धनी पळाला ।।५९।। तो शेटजी पुढें धावत । व्याध पाठलाग त्याचा करित । वाटेंत कमंडलूद्भव गंगा लागत । दैवयोगें त्या उभयतांच्या ।।६०।। त्या गंगेस उल्लंघून जात । तो धनिक भयभीत । तो व्याधही

नदींत उतरत । पैलतीरीं जात उल्लंघून ।।६१।। त्यायोगें त्या तीर्थाचें जल स्पर्शत । व्याध पडतां कुंडांत । तो धनिक पळून जात । प्राण वांचवी आपुला ।।६२।। व्याध निश्वास टाकित । तदनंतर स्वगृहीं परतत । पापें असंख्य आचरित । अन्तीं मरण पावे तो दुर्मती ।।६३।। यमदूत त्या व्याधास । बांधून नेती यमपुरास । धर्मराज पाहून त्यास । प्रेमयुक्त वचन तैं बोले ।।६४।। महाभागांनो हा पुनीत । शुद्ध सर्वपापवर्जित । ब्रह्मकमंडलूतीर्थांत । पडला होता धावतांना ।।६५।। त्या समयीं तीर्थजळाचा स्पर्श । होऊन पवित्र यास । तीर्थदर्शनेंही विलयास । दुरितें याचीं सर्व गेलीं ।।६६।। अनेक जन्मांची पापें नासतीं । या तीर्थजलाच्या दर्शनस्पर्शनें जगतीं । त्यानंतर पापकर्मे जीं घडतीं । तीं यातनाप्रद होणार ।।६७।। तथापि हा योग्य नसत । यातना भोगण्या सांप्रत । काश्मीरदेशी ब्राह्मण कुळांत । जन्मासी याला घालावें ।।६८।। ती आज्ञा पालन करिती । त्या नरासी तैसेचि करिती । ऐशापरी नाना जन होती । पापहीन या प्रकारें ।।६९।। ऐसाचि एक पूर्ववृत्तान्त । सांगतों तुम्हां वंगदेशांत । होता शूद्र एक पापी अत्यंत । श्याम नांव तयाचें ।।७०।। तो श्याम शिश्नउदरपरायण । चौर्यकर्म करी नित्य नूतन । शस्त्रधारी करी हनन । बहुविध जनांसी तो नित्य ।।७१।। नगरांत तैसेंचि वनांत । जनांस तो मारित । मद्यमांस भोगी सतत । तो एकदां गेला वनांत ।।७२।। तेथ उत्तम धनिक वाणी पाहत । तो दुष्ट त्यांचा पाठलाग करित । ते वाणी जाती दंडकारण्यांत । तो शूद्रही जाई तेथें ।।७३।। चोरीच्या आशेनें तेथ जात । तैं ते मार्गस्थ तृषार्त । जलहीन सारे भटकत । पोहोचले ब्रह्मकमंडलूतीर्थावरी ।।७४।। त्या तीर्थाचें पाणी पिऊन । सारे परतले ग्रामीं प्रसन्न । रात्रीं असतां निद्रामग्न । त्या चोरानें त्यांस ठार मारिलें ।।७५।। देवेंद्र नगरांत सारे गेले । पुण्यप्रभावें मुक्त झाले ।

ब्रह्मकमंडलूच्या जलपानानें झाले । इंद्रपुरीचे निवासी ।।७६।। त्या वणिग्जनांना मुक्ति मिळत । तिकडे तो चोरही होत मृत । यमदूत त्यास पकडून नेत । दुष्ट कर्मांनीं तयाच्या ।।७७।। त्यास यमराजापुढे नेती । तेव्हां ते दूतांसी म्हणती । हा शूद्र जरी पापी जगतीं । तरी तेवढाचि पुण्यवान ।।७८।। सर्व तीर्थमयींत केलें जलपान । त्या जलाच्या स्पर्शें हा पावन । दर्शनस्पर्शनपानें पुण्यवान । त्रिविध परीनें हा झाला ।।७९।। त्या जन्मांतले पाप नष्ट झालें । तीर्थदर्शनानें तें निमालें । अनेक जन्मांत जें घडलें । तीर्थस्पर्शे विनष्ट पाप ।।८०।। ह्या तीर्थाच्या पानानें लाभलें । यास इंद्रपदप्राप्ति पुण्य हें भलें । त्यानें अंतर्बाह्य पाप लोप पावलें । हा झाला पूर्ण पुण्ययुक्त ।।८१।। म्हणोनि यास घेऊन । जावें इंद्राकडे विनत होऊन । हा तेथ भोग भोगील प्रसन्न । यांत संशय मुळीं नसे ।।८२।। तेथ सुखोपभोग भोगून । पुण्य सरतां पुनरपि होईल पतन । याचें पृथ्वीवरी हें निश्चित वचन । ऐकतां यमदूत म्हणती ।।८३।। स्वामी आम्हीं तैसें करतों । यास इंद्रनगरींत नेतों । आपुली आज्ञा पाळितों । दास आम्ही आपुले ।।८४।। ऐशियापरी नाना अमर । तैसेचि सिद्धि पावले विविध नर । त्यांचें वर्णन समग्र । शतवर्षांनींही न पूर्ण होय ।।८५।। ऐसाच एक इतिहास पुरातन । महाभागांनो सांगतों मीं प्रसन्न । स्नान करितां सिद्धि लाभून । धन्यता लाभती सर्व प्राणी ।।८६।। धनप्रिय नावाचा एक सुतार । बंगालांत होत दुष्ट चोर । तो पापें करी अनिवार । द्रव्यार्थ वधिलें मातापित्यासी ।।८७।। विष देऊन त्यासी मारित । ब्राह्मणादींस प्रणाम करित । तद्नंतर त्यांसही वधित । विष त्यांसी देऊनी ।।८८।। पापनिष्ठ तो दुर्मति । बाहेरून साधुभाव दावून अती । दुरात्मा ठेवी दुष्टभाव चित्तीं । त्यायोगें भुलती जन सारे ।।८९।। ते त्याच्या होती अधीन । विश्वास त्यांच्या मनीं निर्मून । द्रव्यार्थ ठार

मारी तो दुर्मन । विश्वासघात करूनिया ।।९०।। ऐसा बहू काळ जात । त्या दुष्टाचें कर्म अघटित । नृपासी झाले विदित । राजदूत त्यास पकडिती ।।९१।। त्याचें सर्व धन करिती हरण । मारिती त्यासी अति दारुण । स्वदेशांतून देती घालवून । राजा धर्मपरायण होता ।।९२।। तो धर्मनिती राज्य करित । सदैव लोकांचें पालन करित । तिकडे तो सुतार दंडकारण्यांत । पुत्रदारासहित गेला ।।९३।। तेथील एका गावांत । निवास करी तो मोदयुक्त । पुनरपि तैसीच वृत्ति आचरित । पापें तींच करीत असे ।।९४।। एकदां एक वाणी पाहत । त्याचें धन त्यास मोहवित । त्यास विष देण्याचें ठरवित । दुष्टबुद्धी तो कारुक ।।९५।। त्या वाण्यास भुलविण्यास । साधुलक्षणें धरी खास । मार्गांत महानदींत स्नानास । सर्वतीर्थमयींत तो वाणी करी ।।९६।। तो पापीही अनुकरण करित । धर्माचरणाचें सोंग वठवित । दुसऱ्या दिवशीं मार्गात । विष देऊन वधिलें त्यासी ।।९७।। त्या स्नानपुण्यें तो वाणी जात । शुक्ल गतीनें महेश्वराप्रत । कमंडलूतीर्थस्नानें लाभत । क्रममुक्ती तयासी ।।९८।। धनप्रिय तो चोर मरत । यथाकाळ स्वगृहांत । त्यासही मोक्ष प्राप्त होत । महादेवांनो स्नानप्रभावें ।।९९।। कमंडलूतीर्थाचें पावन । सांगतों तुम्हां चरित महान । महासिद्धिप्रद अन्य शोभन । गुजरात देशींची ही कथा ।।१००।। गुर्जरदेशीं वैश्यकुळांत । धर्मनामक एक स्वधर्म रत । तो आदरें नित्य कर्म करित । एकदां ऐके स्कंदपुराण ।।१०१।। त्या स्कंदपुराणीं ऐकत । कमंडलूतीर्थाचें माहात्म्य अद्भुत । मनीं होत अत्यंत विस्मित । म्हणे धन्य हें तीर्थश्रेष्ठ नदी ।।१०२।। ह्या नदीचें होईल दर्शन । तरीच सफळ माझा जन्म पावन । तो धर्म नित्य करी स्मरण । त्या महानदीचें भक्तीनें ।।१०३।। तदनंतर एकदां येत । कोणी एक क्षत्रिय यात्रारत । त्यानेंही ब्रह्मकमंडलूचे नांव अद्भुत ।

ऐकिलें त्या वैश्याकडून ।।१०४।। तो मार्गस्थ प्रात:काळीं उठत । आपुल्या स्थानासी निघून जात । नंतर बहु काळ लोटत । धर्मवैश्य मृत्यु पावला ।।१०५।। तो स्वर्गी जाऊन भोगत । विविध स्वर्गीय भोग अद्भुत । पुनरपि पृथ्वीवरी जन्मत । अत्रि कुळांत द्विजवर्णी ।।१०६।। शिवदत्त ऐशा नामें ख्यात । तो करी तीर्थयात्रा अविरत । एकही नदीतट न सोडित । स्नानपुण्य जोडी सर्वत्र ।।१०७।। पूर्वपुण्यबलें उत्तमतीर्थसेवन। करून झाला तो पावन । योगी होऊन आलें मरण। तीर्थोत्तमस्मरणानें तयाला ।।१०८।। ब्रह्मांत तो लय पावत । होऊनिया ब्रह्मभूत । देवसत्तमांनो ऐशापरि होत । स्मरणेंही गतिप्रद हें तीर्थ ।।१०९।। ज्या क्षत्रियें होतें ऐकिलें । सर्वतीर्थाचें माहात्म्य भलें । त्यानें पापकर्म न सोडिलें । आसक्तीच्या प्रभावानें ।।११०।। तो क्षत्रिय जेव्हां मृत्यु पावत । तेव्हां यमदूत त्यास पकडित । ताडन करून ते नेत । भानुपुत्रासमोर ।।१११।। त्यास प्रणाम करून । मागती आज्ञा प्रमाण । ती मिळता टाकिती नेऊन । महा घोर नरकांत तयासी ।।११२।। तो नंतर श्वानयोनींत । जन्मला अत्यंत पापरत । दंडकारण्यांत हिंडत । महानदीतटीं गेला ।।११३।। तेथ कीटक माश्या त्रास देत । तैं तो स्नान करी महानदींत । पूर्वसंस्कारयोगें मरत । श्वानरूप तो त्या क्षेत्रीं ।।११४।। त्या पुण्यप्रभावें मोक्ष लाभत । यांत संशय अल्पही नसत । एकदाच ऐकतां नाम पुनीत । तीर्थाचें त्या हें पुण्य ।।११५।। धन्य धन्य त्या वृक्षलता । ज्या ब्रह्मकमंडलूतीरीं वाढतां । पावत पावनत्व तत्त्वतां । जें अन्यत्र ना राज्य लाभेंही ।।११६।। ज्या महानदीच्या तीरावर । मृत्यु येतां तो नरवर । शुक्लगति पावे ब्रह्म अमर । अन्यत्र मरतां पुनर्जन्म ।।११७।। देवेशांनो ऐसें सर्वत्र । ब्रह्मकमंडलूसरिता पवित्र । मयूरेशपरायण मात्र । शुभदा पूर्वगा ख्यात असे ।।११८।।

चतुर्मुखासी वा शिवासी । हृषीकेशासी वा अन्य देवांसी । दुर्लभा ही नदी सर्वांसी । कमंडलूतून जी जन्मली ।।११९।। या कमंडलूच्या मुळांत । कोटि तीर्थें असती स्थित । मध्यमभागीं अन्तीं वर्तत । कोटी कोट्यार्ध तीरावरती ।।१२०।। मीं संक्षेपानें कथिलें चरित । महादेवांनों तुम्हांप्रत । त्या ब्रह्मकमंडलु तीर्थाचें अद्भुत । पापहर वाचनें पठणें हें तीरावरती ।।१२१।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते ब्रह्मकमंडलुतीर्थचरितं नाम पंचविंशतितमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पंचविसांवा संपूर्ण)